महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत
प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी
पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना
अनुदान वितरीत करण्याबाबत.
नगरपरिषद इंदापूर, जि. पुणे

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७ /पापु.२२

गो.ते. हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १६ नोव्हेंबर, २०१६

वाचा :

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१/पापु२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २००८/प्र.क्र.१९८ /पापु२२, दिनांक २३ डिसेंबर, २००८
३. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ २०११/प्र.क्र.५६५ /पापु.२२ दिनांक १५.१०.२०११
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु.२२ दिनांक १.११.२०१३
५. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु.२२ दिनांक १८.३.२०१४
६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु.२२ दिनांक ९.९.२०१४
७. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ २०१३/प्र.क्र.४९७/पापु.२२ दिनांक १२.५.२०१६
८. मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद, इंदापूर यांचे पत्र क्र.इंनप/पापु/१२६३/२०१५-१६, दि.१४.९.२०१६

प्रस्तावना :

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उदद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. शासन निर्णय, दिनांक १५.१०.२०११ अन्वये इंदापूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.३४,९४,६७,०००/- इतक्या भांडवली कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयाप्रमाणे, इंदापूर नगर परिषदेस रु. ३१,४५,२०,३००/- इतके अनुदान अनुज्ञेय असून इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी रुपये ३४९.४७ इतकी रक्कम बँकेत भरणे आवश्यक आहे. त्यापैकी इंदापूर नगर परिषदेने एकूण रु.२८९.०४ लक्ष इतकी रक्कम बँकेमध्ये जमा केली आहे. इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्यापोटी यापुर्वी बँकेत भरलेल्या रु. २४९.०४ लक्ष रकमेच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदानापैकी शासन निर्णय, दि. १.११.२०१३ अन्वये रुपये ४५४.५० लक्ष, शासन निर्णय, दि.१८.३.२०१४ अन्वये रु.५२६.८५ लक्ष तसेच शासन निर्णय दि. ९.९.२०१४ अन्वये रु.२२४.८३ लक्ष, शासन निर्णय दिनांक २३.१०.२०१५ अन्वये रुपये ७६५.१६ लक्ष तसेच शासन निर्णय दिनांक १२.०५.२०१६ रोजी रुपये २६९.९९ लक्ष असे एकूण रुपये २२४१.३३ लक्ष इतके अनुदान इंदापूर नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे. मुख्याधिकारी, इंदापूर नगर परिषद यांनी दि. १४.९.२०१६ च्या पत्रान्वये स्वहिश्श्याच्या रकमेपैकी रु.४०.०० लक्ष इतकी रक्कम बँकेमध्ये जमा केली असल्याचे तसेच प्राप्त झालेल्या अनुदानापैकी रु.२५४५.१७ लक्ष रुपयाचे विनियोग प्रमाणपत्र सादर केले आहे. इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्याची रक्कम रु. ३४९.४७ लक्ष इतक्या रकमेपैकी रुपये २८९.०४ लक्ष रक्कम बँकेत जमा केली असून त्याप्रमाणात इंदापूर नगर परिषदेस रु.२६०१.३३ लक्ष इतके अनुदान अनुज्ञेय असून इंदापूर नगर परिषदेस यापूर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान रुपये २२४१.३३ लक्ष वजा जाता रुपये ३६०.०० लक्ष इतके अनुदान इंदापूर नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि. १५.१०.२०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या इंदापूर शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांकरीता एकूण अनुज्ञेय अनुदानापैकी, इंदापूर नगर परिषदेने स्वहिश्श्श्यापोटी बँकेमध्ये जमा केलेल्या रकमेच्या प्रमाणात, उर्वरित अनुदान रुपये रु.३६०.०० लक्ष (रुपये तीन कोटी साठ लाख फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना-कडून याद्वारे वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. |
| इंदापूर | ३४९४.६७ | ३१४५.२० | ३४९.४७ | २८९.०४ | २२४१.३३ | **३६०.००** |
| | | | | | **एकुण रुपये** | **३६०.००** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२)

नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२ दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११६१५२९४९७७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar L Chakre

Digitally signed by Prabhakar L Chakre
DN: CN = Prabhakar L Chakre, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2016.11.16 16:50:14 +05'30'

(प्र.ल.चक्रे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

- मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
- प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
- विभागीय आयुक्त, महसुल विभाग, पुणे विभाग, पुणे
- जिल्हाधिकारी, पुणे
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- अध्यक्ष/मुख्याधिकारी, नगरपरिषद, इंदापूर, जि. पुणे
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
- जिल्हा प्रकल्प अधिकारी, (नगरपालिका) जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु.२०,पापु.२४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.